**महाराष्ट्र राज्यातील लघु व मध्यम उपक्रमांना शासन नियुक्त यंत्रणेमार्फत वितरीत करण्यात येणाऱ्या कोळशाच्या वाटपाबाबत मार्गदर्शक तत्त्वामधील परि . क्र. ५.२ व ६ मध्ये ६.३ नव्याने समावेश करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. कोळसा-२०१४/प्र.क्र.२७५/उद्योग-७,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०१ जानेवारी, २०१९

वाचा :- १) शासन परिपत्रक्र क्र. कोळसा-२००९/प्र.क्र.२९/उद्योग-७, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि. ०७/११/२००९.
२) शासन निर्णय क्र. कोळसा-२०१४/प्र.क्र.२७५/उद्योग-७, दि. १२/०७/२०१६.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णय अधिक्रमीत करुन संदर्भ क्र. २ अन्वये महाराष्ट्र राज्यातील लघु व मध्यम उपक्रमांना शासन नियुक्त यंत्रणेमार्फत वितरीत करण्यात येणाऱ्या कोळशाच्या वाटपाबाबत मार्गदर्शक तत्त्वे याबाबतचा शासन निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे.

सदर शासन निर्णयामधील परि . क्र. ५.२ मध्ये विट उत्पादक उद्योग घटकांना स्लॅक प्रतीचा कोळसा वाटप करण्यात येईल अशी तरतूद व परि. क्र. ६ मध्ये शासन नियुक्त यंत्रणेमार्फत वितरीत होणाऱ्या कोळशाचा उद्योग उत्पादक घटक त्यांच्या स्वत:च्या उत्पादनाकरिता वापर करतात अथवा नाही यावर नियंत्रण करण्याकरिता काही कालावधीच्या अंतराने तपासणी/संनियंत्रण करण्याकरिता संबंधित जिल्हा उद्योग केंद्राने पर्यवेक्षीय पथकाची स्थापना, पर्यवेक्षीय पथकाची रचना करण्याबाबत तरतूद नमूद आहे. तथापि, सदर शासन निर्णयामध्ये विट उत्पादक उद्योग घटकांना वितरीत करण्यात आलेल्या कोळशाचा विट उत्पादक उद्योग घटक त्यांच्या स्वत:च्या उत्पादनाकरिता वापर करतात अथवा नाही याबाबतची तरतूद शासन निर्णयामध्ये नमूद नाही.

दरम्यानच्या कालावधीतकोळसा वितरण करताना, १) द नाग विदर्भ ब्रिक्स मॅन्युफॅक्चरर्स असोसिएशन, नागपूर २) नांदेड जिल्हा मागासवर्गीय कुंभार समाज वीट उत्पादक संघ या विट उत्पादक घटकांनी स्लॅक प्रतीचा कोळसा उपलब्ध होत नसल्याने, स्लॅक प्रतीपेक्षा कमी प्रतीचा मिक्स-CrusRom प्रतीचा कोळसा उपलब्ध करुन द्यावा अशी शासनास विनंती केलेली आहे. तद्नुषंगाने महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ, नागपूर व विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्याकडून अहवाल मागविला असता, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ यांनी स्लॅक प्रतीपेक्षा कमी प्रतीचा कोळसा मिक्स-CrusRom प्रतीचा वितरण करण्यास हरकत नसावी अशी शिफारस केलेली आहे. तद्नुषंगाने दि. १२/०७/२०१६ रोजीच्या शासन निर्णयामधील परि. क्र. ५.२ मध्ये नमूद केलेल्या तरतूदीमध्ये अंशत: बदल करण्याची व परि. क्र. ६ मध्ये विट उत्पादक उद्योग घटकांना वितरीत केलेला कोळशाचा वापर त्यांच्या स्वत:च्या विट उत्पादक उद्योग घटकासाठी करत आहे याबाबतची तपासणी करण्यासाठी जबाबदारी सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

शासन निर्णय क्र. कोळसा-२०१४/प्र.क्र.२७५/उद्योग-७, दि. १२/०७/१६रोजीच्या शासन निर्णयामधील तरतूद क्र. ५.२ मध्ये विट उत्पादक उद्योग घटकांना स्लॅक प्रतीचा कोळसा वाटप करण्यात येईल असे नमूद आहे. त्यामध्ये सदर स्लॅक प्रतीचा कोळसा उपलब्ध नसल्यास स्लॅक प्रतीपेक्षा कमी प्रतीचा, मिक्स-CrusRom (G-१० ते G-१५) प्रतीचा कोळसा विट उत्पादक उद्योग घटकांना वितरीत करण्यात येईल असे समाविष्ट करण्यात येत आहे.

तसेच परि. क्र. ६ मध्ये ६.३ नुसार असे समाविष्ट करण्यात येत आहे की, विट उत्पादक घटकांना वितरीत केलेल्या कोळशाचा वापर त्यांच्या स्वत:च्या विट उत्पादक उद्योग घटकासाठी करत आहे याबाबतची तपासणी कोळसा वितरीत केल्यानंतर ८ ते १० दिवसांत स्थळ पाहणी (Site Inspection) करण्याबाबत व संनियंत्रण करण्याबाबत जिल्हा खनिकर्म अधिकारी यांच्यावर जबाबदारी सोपविण्यात येत आहे . त्यानुसार जिल्हा खनिकर्म अधिकारी यांनी स्थळ पाहणी (Site Inspection) अहवाल संबंधित नोडल एजन्सीकडे विहीत कार्यपद्धतीने सादर करावा. याबाबतची अन्य कार्यपद्धती संदर्भ क्र. २ येथे नमूद दि. १२/०७/२०१६ च्या शासन निर्णयाप्रमाणे राहील याची सर्व संबंधित यंत्रणांनी नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१९०१०११३०२०९६०१० असा आहे. हा आदेश डिजीटील स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay
Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f0d616600e4d2f510d1c8cc19813e070ad282d2275bf6fc132a2dee97f14e0a6, serialNumber=d337930b14433dc62c0154af2bbc60bb5a6edcaa66b7f34596c50a27eb0f6333, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2019.01.01 15:42:31 +05'30'

**(संजय इंगळे)**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. विरोधीपक्ष नेते, विधान परिषद व विधान सभा, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई.
२. राज्यातील सर्व संसद सदस्य .
३. सर्व सन्माननीय विधान सभा व विधान परिषद सदस्य .
४. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव.
५. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव .
६. मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
७. मा. मुख्य सचिवांचे उप सचिव.
८. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
९. सर्व विभागीय आयुक्त/सर्व महसुल विभाग.
१०. सर्व जिल्हाधिकारी (सर्व जिल्हे)
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म विकास महामंडळ मर्या., नागपूर.
१२. संचालक, भुविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
१३. उद्योग सह संचालक, मुंबई, ठाणे, पुणे, नाशिक, अमरावती, औरंगाबाद व नागपूर (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)

१४. सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (सर्व जिल्हे) (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)

१५. सर्व उपविभागीय अधिकारी, सर्व महसूल उपविभाग (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)

१६. सर्व तहसिलदार (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)

१७. सर्व खनिकर्म अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)

१८. निवडनस्ती (उद्योग-७).